**केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियान कुळगांव-बदलापूर शहराच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- अमृत-२०१६/प्र.क्र.१८७(११) /नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २७ एप्रिल, २०१७

वाचा:-

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:अमृत-२०१५/प्र.क्र.१९७/नवि-३३, दिनांक १३ ऑक्टोबर, २०१५.
२. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:अमृत-२०१६/प्र.क्र.१४६/नवि-३३, दिनांक१८ एप्रिल, २०१६.
३. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:अमृत-२०१६/प्र.क्र.१४६/नवि-३३, दिनांक२२ मार्च, २०१७.
४. अमृत अभियानांतर्गत गठीत राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीच्या दिनांक २३.०६.२०१६रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त.
५. अमृत अभियानांतर्गत गठीत राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या दिनांक ११.०४.२०१७ रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना: -

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाची अंमलबजावणी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सन २०१५-१६ वर्षापासून राज्यामध्ये करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा, मलनिस्सारण, पर्जन्यजलवाहिनी, नागरी परिवहन व हरित क्षेत्र विकास इ. पायाभूत सुविधांची निर्मिती अभियान शहरांमध्ये करण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानांतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या राज्य वार्षिक कृति आराखडयास केंद्र शासनाने मान्यता दिलेली असून सदर आराखडयामध्ये **कुळगांव-बदलापूर शहराच्या हरित क्षेत्र विकास** प्रकल्पाचा समावेश आहे.

०२. अमृत अभियानांतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल हा **कुळगांव-बदलापूर नगरपरिषदेमार्फत** तयार करण्यात आला होता. सदर प्रकल्पास **शहर अभियंता, उल्हासनगर महानगरपालिका यांनी तांत्रिक मान्यता** दिली आहे. केंद्र शासनाच्या सूचनेनुसार राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीने राज्यस्तरीय तांत्रिक समितीस हरित क्षेत्र विकास प्रकल्पांचे डीपीआरना मान्यता देणेबाबत संदर्भाधीन क्रमांक ४ च्या बैठकीन्वये प्राधिकृत केलेले आहे. त्यानुसार सदर प्रकल्प अहवालास अमृत अभियानांतर्गत गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या संदर्भाधीन क्रमांक ५ च्या बैठकीन्वये मान्यता दिलेली आहे. त्यानुसार राज्यस्तरीय

तांत्रिक समितीने केलेली शिफारसवशासनाच्यामान्यतेच्या अनुषंगाने अमृत अभियानाच्या **सन २०१५-१६** या आर्थिक वर्षाच्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या **कुळगांव-बदलापूर शहराच्या** हरित क्षेत्र विकास प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत **सन २०१५-१६** या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाकडून मंजूर केलेल्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या **कुळगांव-बदलापूर शहराच्या** हरित क्षेत्र विकास प्रकल्पास संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतूदीच्या अधीन राहून खालील परिच्छेदक्र. २ मधील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. **कुळगांव-बदलापूर शहराच्या** हरित क्षेत्र विकास प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

| Sr. No. | Description | QTY | Unit | AMOUNT (in Rs.) |
|---|---|---|---|---|
| **A** | **LANDSCAPE WORKS** | | | |
| **1** | Plantation Works | | | |
| **a** | above 2m ht | 2958.00 | No | 40,25,732 |
| **b** | upto 2m ht | 2242.00 | No | 20,71,608 |
| **2** | Hedges | 1434.00 | Sqm | 8,67,570 |
| **3** | Lawn | 1750.00 | Sqm | 12,11,000 |
| **B** | **CIVIL WORKS** | | | |
| **4** | Dust Bins | 10 | No | 1,10,892 |
| **5** | Compaction work (Parking area) | 500.00 | Sqm | 3,000 |
| **6** | Water Supply ; pipe line, pumps, cables etc | | | 5,79,194 |
| **7** | Brick edge | 6064.00 | No | 43,539 |
| **8** | Pathway | 340.00 | Sqm | 5,29,665 |
| **9** | Toe wall | 144.00 | Rmt | 1,68,929 |
| **11** | Toilet Block | 1.00 | No. | 3,88,583 |
| | **Total Cost** | | | **99,99,712** |
| | | | **Say Rs.** | **1.00 Cr.** |

०३ . **कुळगांव-बदलापूर शहराच्या** हरित क्षेत्र विकास योजनेचा केंद्र शासनाकडून मंजूर राज्य वार्षिक कृति आराखडयानुसार वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे आहे. **(किंमत रु.कोटी)**

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत (डीपीआर नुसार) | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ५०%) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या २५%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या २५ %) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | कुळगांव-बदलापूर नगरपरिषद | १.०० | ०.५० | ०.२५ | ०.२५ |

०४. संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार **कुळगांव-बदलापूर** शहराच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा **कुळगांव-बदलापूर नगरपरिषद** राहील.

४.२ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन क्रमांक १ चा शासन निर्णय व संदर्भाधीन क्रमांक २ व ३ च्या शासन परिपत्रकानुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.३ संदर्भाधीन क्रमांक ३ च्या परित्रकातील विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

४.४ सदर प्रकल्पासाठी निविदा प्रक्रिया पूर्ण करून कामाचे कार्यादेश तात्काळ देण्यात येतील याची कार्यान्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४.६ राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या बैठकीतील इतिवृत्तामध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता करणेसंबंधित अभियान शहरांना व कार्यान्वयन यंत्रणांना बंधनकारक राहील.

४.७ केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारणांची (Reforms) पूर्तता विहित कालावधीत पूर्ण करणे संबंधित अभियान शहरास बंधनकारक राहील.

४.८ **निधी वितरणाची कार्यपद्धती:-** केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार केंद्र शासन हिश्याचा निधी हा तीन टप्यात (२० टक्के+४० टक्के+ ४०टक्के) वितरीत केला जाणार आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा निधी केंद्र हिस्सा वितरीत करताना सोबत वितरीत केला जाईल.

४.९ सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याचा प्रथम हप्त्याचा निधी यापूर्वीच नागरी स्थानिक स्वराज संस्थेस वितरीत करण्यात आला आहे. त्यानुसार केंद्र शासनाने

विहित केल्यानुसार उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केलेनंतर पुढील हप्त्याचा केंद्र हिश्याचा व त्याप्रमाणात राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४.१० अमृत अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज संस्थांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या १४ व्या वित्त आयोगाच्या निधीशी **एककेंद्राभिमुख** (Convergence) करणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी १४ वा वित्त आयोगातून मिळणारा निधी चिन्हांकीत करून ठेवावा.

४.११ अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्था हिश्याचा निधी उभा करून सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात शासनास सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

४.१२ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

४.१३ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

४.१४ सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीत पूर्ण करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यान्वयनयंत्रणेची राहील.

४.१५ प्रकल्पाचे काम सुरु झालेनंतर प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केलेनंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१६ हरित क्षेत्र विकास प्रकल्पाच्या देखभाल दुरुस्ती खर्चासाठी आवश्यक ती यंत्रणा अभियान शहरांनी विकसित करावी व त्याद्वारे सदर प्रकल्पासाठीचा देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यात यावा.

४.१७ हरित क्षेत्र विकास प्रकल्पांसाठी आपणांस विहीत करण्यात आलेल्या सल्लागारांच्या मार्गदर्शनाखाली या प्रकल्पाची अंमलबजावणी करणे संबधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

४.१८ सदर प्रकल्पांतर्गत समाविष्ट झाडांची लागवड करताना त्यांची संख्या मुख्याधिकारी यांनी प्रमाणित करावी. तसेच त्यापैकी किमान ८०% झाडे जगतील याबाबत दक्षता घेण्यात यावी.

४.१९ विषयांकित काम प्राधान्याने पूर्ण करण्याचे नियोजन खालील प्रमाणे राहील

| क्रमांक | कामाचा टप्पा | पूर्ण करण्याचा कालावधी |
|---|---|---|
| १ | कामाची निविदा प्रसिद्ध करणे | २ मे २०१७ |
| २ | प्राप्त निविदा स्वीकृतीची सर्व कार्यवाही पूर्ण करणे | २ जून २०१७ पर्यंत |
| ३ | कामाचे कार्यादेश देणे | १० जून २०१७ पर्यंत |
| ४ | काम पूर्ण करणे | कार्यादेश दिल्यापासून ६ महिने |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२७१२०००१६८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.04.28 12:35:55 +05'30'

( पां.जो.जाधव )

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
४. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
५. सचिव,नगर विकास विभाग(२) यांचे स्वीय सहायक
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
८. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई
९. विभागीय आयुक्त,कोकण विभाग, कोकण
१०. मुख्याधिकारी, कुळगांव-बदलापूर नगरपरिषद, कुळगांव-बदलापूर
११. जिल्हाधिकारी, ठाणे
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, ठाणे
१३. निवडनस्ती, नवि-३३.